**मातोश्री वृध्दाश्रमाची पदे बाहययंत्रणेव्दारे भरण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय,क्रमांक:-ज्येष्ठना २०२०/प्रक्र.०२/सामासु**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२,
दिनांक :- २५ जुलै, २०२४

**संदर्भ**:-
१) शासन निर्णय,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक :-संकीर्ण-१०९५/के.नं. १६० / सुधार-२ दिनांक १७ नोव्हेंबर,१९९५.
२) शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.२९/आ.पु.क, दिनांक ०२/०८/२०१६
३) शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क, दिनांक ०९/०६/२०१७
४) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:- ज्येष्ठना २०१६/प्र.क्र.१८/ सामासु,दिनांक ६ मार्च,२०१९
५) शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क, दिनांक २७ एप्रिल,२०२२.

**प्रस्तावना:-**

वृध्दापकाळ चांगल्या प्रकारे घालविता यावा, याकरीता रमाधाम वृध्दाश्रमाच्या धर्तीवर प्रत्येक जिल्ह्यात ०१ वृध्दाश्रम त्यामध्ये निवासाच्या सोयीशिवाय बाग बगीचा, वाचनालय, दुरदर्शन, बैठे खेळ इत्यादी सोयींचा समावेश असलेला सुसज्ज वृध्दाश्रम स्वयंसेवी सस्थेमार्फत अनुदान तत्वावर सुरु करण्याचा निर्णय घेऊन मातोश्री वृध्दाश्रम योजनेस दि. १७/११/१९९५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. संदर्भ ४ येथील दि. ६/३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित असलेल्या २३ मातोश्री वृध्दाश्रमांना अनुदानावर आणण्यात आले असून मातोश्री वृध्दाश्रमातील वृध्दांना परिपोषण अनुदान रु.१५००/-देण्यात येते व मातोश्री वृध्दाश्रमाची पदे भरण्याबाबत मा.मंत्रिमंडळाच्या दि.५/३/२०१९ च्या बैठकीतील निर्णयानुसार २३ मातोश्री वृध्दाश्रमांना प्रत्येकी १४ अशी एकूण ३२२ मानधनावरील पदे निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेसाठी प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावाबाबत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय सचिव समितीची दि. ३०/११/२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये २३ मातोश्री वृध्दाश्रमासाठी प्रत्येकी १४ याप्रमाणे एकूण ३२२ पदांचे काम बाहययंत्रणेकडून करुन घेण्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार मातोश्री वृध्दाश्रमातील कर्मचाऱ्यांची पदे बाहययंत्रणेकडून भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. ३०/११/२०२३ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सामाजिक न्याय विभागातंर्गत असलेल्या २३ मातोश्री वृध्दाश्रमासाठी पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रत्येकी १४ अशी एकूण ३२२ पदांचे काम बाहययंत्रणेकडून करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचे नाव | कर्मचारी संख्या |
|---|---|---|
| १ | अधिक्षक | १ |
| २ | वैद्यकीय अधिकारी (अर्धवेळ) | १ |
| ३ | परिचारीका | १ |
| ४ | कनिष्ठ लिपीक | १ |
| ५ | काळजीवाहक | ४ |
| ६ | स्वयंपाकी | २ |
| ७ | स्वयंपाकी मदतनीस | २ |
| ८ | शिपाई | १ |
| ९ | पहारेकरी | १ |
| | **एकूण** | **१४** |

२. सदर पदांची कामे बाहययंत्रणेव्दारे करुन घेताना वित्त विभागाच्या दि. २७ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रकात नमूद केलेल्या सूचनांचा अवलंब करण्यात यावा. तसेच त्यामधील तरतूदीचे आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सन २०२३ मधील उच्च स्तरीय समितीच्या दि.३०/११/२०२३ च्या ८ व्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१७७ / आपुक, दिनांक ०३/०४/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संकेतांक २०२४०७२५१३०४०११४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.07.25 17:56:26 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई

३. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे.
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
११. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण विभाग.
१२. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१३. निवड नस्ती, सामासु.